केंद्र शासनाने जागतिक बँकेच्या सहाय्याने मंजूर केलेली एकात्मिक बाल विकास सेवा योजनेचे बळकटीकरण व पोषण सुधारणा प्रकल्प या नवीन योजनेकरिता विभागांतर्गत कार्यरत असलेल्या पदांमधून तसेच बाहययंत्रणेकडून काम करुन घेण्यास मान्यता देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## महिला व बाल विकास विभाग

## शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०१३/प्र.क्र.४३(भाग-२)/का.६

नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
तारीख: २२ ऑगस्ट, २०१४

**वाचा :-**

१) केंद्र शासन, महिला व बाल विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.२-६/२०१२-WBP, दिनांक १० जानेवारी, २०१३
२) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.एबावि-२०१४/प्र.क्र.६८/का.०६, दिनांक ३०.०४.२०१४
३) उच्चस्तरीय सचिव समितीचे क्र.पदनि-२०१४/प्र.क्र३३/१४/वि.सु.१, दिनांक ३१.०७.२०१४ च्या पत्रान्वये प्राप्त झालेले कार्यवृत्त

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने जागतिक बँकेच्या सहाय्याने दिनांक १०.०१.२०१३ च्या पत्रान्वये मंजूर केलेली एकात्मिक बाल विकास सेवा योजनेचे बळकटीकरण व पोषण सुधारणा प्रकल्प ही नवीन योजना महाराष्ट्र राज्यामध्ये लागू करण्याकरिता शासनाने वाचा क्र.२ अन्वये मान्यता दिलेली आहे. सदर योजना खालील २० जिल्हयातील मंजूर असणा-या एकूण ३१७ प्रकल्पातील ६०१३२ अंगणवाडी केंद्रांना लागू करण्यात येणार आहे.

| अ. क्र. | जिल्हयाचे नांव | अ.क्र. | जिल्हयाचे नाव |
|---|---|---|---|
| | वर्धा | ११ | धुळे |
| २ | नंदुरबार | १२ | बीड |
| ३ | बुलढाणा | १३ | अमरावती |
| ४ | नांदेड | १४ | जालना |
| ५ | गडचिरोली | १५ | नागपूर |
| ६ | चंद्रपूर | १६ | सांगली |

| अ. क्र. | जिल्हयाचे नांव | अ.क्र. | जिल्हयाचे नाव |
|---|---|---|---|
| ७ | जळगांव | १७ | मुंबई |
| ८ | वाशिम | १८ | हिंगोली |
| ९ | अहमदनगर | १९ | नाशिक |
| १० | परभणी | २० | गोंदिया |

या नवीन योजनेच्या अंमलबजावणीचे प्रभावी नियोजन, व्यवस्थापन, पर्यवेक्षण व संनियंत्रण होण्याच्या हेतूने राज्य प्रकल्प व्यवस्थापन कक्ष स्थापन करण्यास व त्याअंतर्गत खालील ६९० पदे निर्माण करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय:-

केंद्र शासनाने जागतिक बँकेच्या सहाय्याने मंजूर केलेली एकात्मिक बाल विकास सेवा योजनेचे बळकटीकरण व पोषण सुधारणा प्रकल्प या नवीन योजनेचे अंमलबजावणीचे प्रभावी नियोजन, व्यवस्थापन, पर्यवेक्षण व संनियंत्रण होण्याच्या हेतूने राज्य प्रकल्प व्यवस्थापन कक्ष स्थापन करण्यास व त्याअंतर्गत खालीलप्रमाणे ३ पदाचे काम कार्यरत पदामधून व ६८७ पदाचे काम शासन परिपत्रक वित्त विभाग, दिनांक २.०२.२०१३ मधील सूचनानुसार बाहययंत्रणेकडून करुन घेण्यास (केंद्र शासनाकडून जोपर्यंत निधी प्राप्त होईल तोपर्यंतच्या कालावधीसाठी) खालील अटींच्या अधिन राहून उच्चस्तरीय सचिव समितीने दिनांक २४.०६.२०१४ च्या बैठकीत मान्यता दिलेली आहे. त्यानुषंगाने शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | प्रकार | पदांची संख्या | वेतनश्रेणी / ठोक रक्कम (प्रत्येक वर्षास ८% वाढीसह) केंद्राचा ९०% व राज्याचा १०% हिस्सा |
|---|---|---|---|---|
| | **राज्यस्तर** | | | |
| १ | राज्य प्रकल्प संचालक | कार्यरत | १ | ३७४००-६७००० ग्रेड पे १०,०००/- |
| २ | सह प्रकल्प समन्वयक (सह आयुक्त / उपायुक्त दर्जाचे) | कार्यरत | २ | ----- |
| ३ | तांत्रिक सल्लागार | बाहययंत्रणेकडून | ६ | रु.६०,०००/- प्रति महा |
| ४ | प्रकल्प सहाय्यक | बाहययंत्रणेकडून | २ | रु.२५,०००/- प्रति महा |
| ५ | लेखापाल | बाहययंत्रणेकडून | १ | रु.४०,०००/- प्रति महा |
| ६ | सचिवीय सहाय्यक | बाहययंत्रणेकडून | २ | रु.१५,०००/- प्रति महा |
| ७ | कार्यालयीन दूत / शिपाई | बाहययंत्रणेकडून | २ | रु.८,०००/- प्रति महा |
| | **िजिल्हास्तर** | | | |
| ८ | जिल्हा समन्वयक | बाहययंत्रणेकडून | २० | रु.३०,०००/- प्रति महा |

| अ.क्र. | पदनाम | प्रकार | पदांची संख्या | वेतनश्रेणी / ठोक रक्कम (प्रत्येक वर्षास ८% वाढीसह) केंद्राचा ९०% व राज्याचा १०% हिस्सा |
|---|---|---|---|---|
| ९ | प्रकल्प सहाय्यक (जिल्हा स्तर) | बाहययंत्रणेकडून | २० | रु.१५,०००/- प्रति महा |
| | **प्रकल्पस्तर** | | | |
| १० | गट समन्वयक | बाहययंत्रणेकडून | ३१७ | रु.१२,०००/- प्रति महा |
| ११ | आहार तज्ञ (गट / प्रकल्प स्तर) | बाहययंत्रणेकडून | ३१७ | रु.८,०००/- प्रति महा |
| | एकूण | | ६९० | |

१) शासन परिपत्रक दिनांक २.०२.२०१३ मधील सूचनानुसार वरील अ.क्र.३ ते ११ यामधील पदांचे काम बाहययंत्रणेकडून करुन घेण्यात यावे.

२) बाहययंत्रणेकडून कामे करुन घेताना शासनावर कोणत्याही प्रकारचा कायमपणाबाबत दावा होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

३) सदर योजनेअंतर्गत पदे भरतांना राजमाता जिजाऊ माता व बाल आरोग्य पोषण मिशन अंतर्गत असणारी सर्व पदे राज्यातील लोकांना सर्वात जास्त फायदा होईल अशाप्रकारे सामावून घेण्यात यावीत.

राज्य प्रकल्प संचालक यांचे कार्यालय, रायगड भवन, नवी मुंबई येथे सुरु करण्यात यावे. राज्य प्रकल्प संचालक यांनी त्यांच्या कार्यालयात तसेच त्यांच्या अखत्यारीतील जिल्हास्तरावर व प्रकलपस्तरावर आवश्यक असणारी पदे बाहययंत्रणेकडून भरण्याबाबत आवश्यकती कार्यवाही करावी. राज्य प्रकल्प संचालनालयांतर्गत येणारी सर्व कार्यरत पदांची व बाहययंत्रणेकडून भरण्यात येणा-या पदांची जबाबदा-या, कर्तव्य व अधिकार याबाबत केंद्र शासनाने वेळोवेळी दिलेले निर्देश लागू राहतील. केंद्र शासनाच्या निर्देशानुसार या पदांच्या जबाबदा-या, कर्तव्य व अधिकार काय असतील याबाबतचे स्वतंत्र आदेश राज्य प्रकल्प संचालक यांचेमार्फत वेळोवेळी निर्गमित करण्यात यावेत.

याप्रकरणी येणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

मागणी क्रमांक एक्स-१

२२३६ पोषण आहार

०२ पोषक अन्न व पेय वितरण

१०१ विशेष पोषण आहार कार्यक्रम

०६ जागतिक बँक सहाय्यित प्रकल्प

(०६) (०२) एकात्मिक बाल विकास सेवा योजनेचे बळकटीकरण व पोषण सुधारणा योजना (ग्रामीण) केंद्र हिस्सा ९०%

०१ वेतन
१३ कार्यालयीन खर्च
३१ सहाय्यक अनुदान (२२३६ १५५१)

मागणी क्रमांक एक्स-१
२२३६ पोषण आहार
०२ पोषक अन्न व पेय वितरण
१०१ विशेष पोषण आहार कार्यक्रम
०६ जागतिक बँक सहाय्यित प्रकल्प
(०६) (०३) एकात्मिक बाल विकास सेवा योजनेचे बळकटीकरण व पोषण सुधारणा योजना (ग्रामीण) राज्य हिस्सा १०%
०१ वेतन
१३ कार्यालयीन खर्च
३१ सहाय्यक अनुदान (२२३६ १५६२)

मागणी क्रमांक एक्स-१
२२३६ पोषण आहार
०२ पोषक अन्न व पेय वितरण
१०१ विशेष पोषण आहार कार्यक्रम
०६ जागतिक बँक सहाय्यित प्रकल्प
(०६) (०४) एकात्मिक बाल विकास सेवा योजनेचे बळकटीकरण व पोषण सुधारणा योजना (नागरी) केंद्र हिस्सा ९०%
१३ कार्यालयीन खर्च
३१ सहाय्यक अनुदान (२२३६ १५७१)

मागणी क्रमांक एक्स-१
२२३६ पोषण आहार
०२ पोषक अन्न व पेय वितरण
१०१ विशेष पोषण आहार कार्यक्रम
०६ जागतिक बँक सहाय्यित प्रकल्प
(०६) (०५) एकात्मिक बाल विकास सेवा योजनेचे बळकटीकरण व पोषण सुधारणा योजना (नागरी) राज्य हिस्सा १०%
१३ कार्यालयीन खर्च
३१ सहाय्यक अनुदान (२२३६ १५८९)

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२२१७२२१४३८३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Baliram Balu Chavhan

Digitally signed by Baliram Balu Chavhan
DN: CN = Baliram Balu Chavhan, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Women & Child Development
Reason: I am the author of this document
Date: 2014.09.05 16:04:02 +05'30'

**(ब. बा. चव्हाण)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री / राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
६. मा. सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
७. प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
९. प्रधान सचिव, (आरोग्य व कुटुंब कल्याण), मंत्रालय, मुंबई
१०.सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
११.संचालक, राष्ट्रीय ग्रामीण व आरोग्य मिशन, औरंगाबाद
१२.क्षेत्रिय संचालक, राष्ट्रीय बालकल्याण व जनसहयोग संस्थान,
१३.क्षेत्रिय अधिकारी खाद्य व पोषण मंडळ
१४.प्राचार्य, मध्यमस्तर प्रशिक्षण केंद्र (सर्व)
१५.प्राचार्य, अंगणवाडी कार्यकर्ती प्रशिक्षण केंद्र (सर्व)
१६.आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे
१७.सर्व विभागीय आयुक्त
१८.सर्व जिल्हाधिकारी

१९.सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद

२०.सर्व महानगरपालिका आयुक्त, महानगरपालिका

२१.सर्व मुख्य अधिकारी, नगरपालिका,

२२.सर्व मंत्रालयीन विभाग

२३. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), महाराष्ट्र मुंबई / नागपूर

२४. महासंचालक, राजमाता जिजाऊ माता-बाल आरोग्य व पोषण मिशन, औरंगाबाद

२५. सर्व उपमुख्य कार्यकारी अधिकारी, (बाल कल्याण), जिल्हा परिषद

२६. सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी

२७. सर्व जिल्हा शिक्षण अधिकारी

२८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

२९. निवासी लेखा परिक्षा अधिकारी मुंबई

३०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी

३१. महिला व बाल विकास विभागातील सर्व कार्यासने

३२. निवड नस्ती (कार्यासन ६)